तात्काळ / कालमर्यादा

मुख्यमंत्री सहाय्यता निधी.
गुजरात राज्यातील भूकंपग्रस्तांना मदत.
शासकीय/निमशासकीय कर्मचारी
यांच्याकडून निधीस देणग्या...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/(भाग-२)१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० फेब्रुवारी, २००१.

संदर्भ :- क्रमांक : सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/१६-अ, दि.३० जानेवारी,२००१ चे परिपत्रक

## परिपत्रक

गुजरात राज्यात दि.२६ जानेवारी, २००१ रोजी झालेल्या भीषण भूकंपामुळे झालेली प्राणहानी व वित्तहानी प्रचंड आहे. नैसर्गिक आपत्तीच्या ह्या दुर्धर प्रसंगी कर्तव्यबुध्दीने अर्थसहाय्य करण्याची जबाबदारी सर्वांवरच आहे. भूकंपग्रस्त राज्यातील आपदग्रस्तांना मदत करण्यासाठी शासनाकडून प्रयत्नांची पराकाष्ठा चालू आहे व त्यासाठी मुख्यमंत्र्यांच्या सहाय्यता निधीला देणग्यांची आवश्यकता आहे.

२. भूकंप ही नैसर्गिक स्वरुपाची आपत्ती आहे. आपत्तीचे भीषण स्वरुप पाहता,असे अर्थसहाय्य जमा करण्यामध्ये कर्मचा-यांचा सहभाग असणे आवश्यक आहे. या करीता महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाने सर्व राजपत्रित अधिका-यांचा एक दिवसाचा पूर्ण पगार राज्य शासनाच्या यंत्रणेकडे जमा करण्याचा निर्णय घेतला होता.त्यास अनुसरुन मुख्यमंत्री सहायता निधीमध्ये राजपत्रित आणि अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांच्याकडून एक दिवसाच्या एकूण वेतनाइतकी रक्कम वेतनातून वसूल करण्याचे आदेश संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये देण्यात आले आहेत. आता १)राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना,महाराष्ट्र ,२)महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ, आणि ३) सरकारी / निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना समन्वय समिती या संघटनांनी शासनातील सर्व संवर्गातील आणि सर्व विभागातील अराजपत्रित कर्मचारी , सर्व जिल्हा परिषदांचे सर्व संवर्गातील आणि विभागातील कर्मचारी,जिल्हा परिषदा, नगर परिषदा यांचे प्राथमिक शिक्षक व अनुदान प्राप्त खाजगी संस्थांचे प्राथमिक शिक्षक ,माध्यमिक शाळांचे शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी ,कनिष्ठ महाविद्यालयाचे प्राध्यापक व शिक्षकेत्तर कर्मचारी ,महाविद्यालयांचे प्राध्यापक व शिक्षकेत्तर कर्मचारी,कृषि विद्यापीठे व कृषित्तर विद्यापीठे यामधील प्राध्यापक व शिक्षकेतर कर्मचारी ,आणि महाराष्ट्र गृहनिर्माण मंडळाचे कर्मचारी यांच्या फेब्रुवारी महिन्याच्या वेतनातून एक दिवसाचा पगार परस्पर कापून घ्यावा, अशी शासनास विनंती केली आहे.त्यास अनुसरुन राज्य शासनाने असा निर्णय घेतला आहे की, आता
गट ब (अराजपत्रित),गट क आणि गट ड च्या कर्मचा-यांकडून भूकंपग्रस्तांच्या मदतीसाठी एक दिवसाचे एकूण वेतनाइतकी रक्कम वेतनातून वसूल करण्यास हरकत नसावी.

३. परिच्छेद १ व २ मध्ये दर्शविलेल्या परिस्थितीचा विचार करता असे निदेश देण्यात येत आहेत की,

अ) सर्व गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड चे कर्मचारी तसेच शिक्षक व प्राध्यापक यांच्या (फेब्रुवारी, २००१ च्या, मार्च, २००१ मध्ये देण्यात येणा-या ) एकूण मासिक वेतनातून (महागाई व अन्य भत्यासहित) (ग्रॉस पे) एक दिवसाचे वेतन (इ) व (ई) च्या अधिन राहून परस्पर कापून घेण्यात यावे. संघटनेने प्रस्तावित केल्याप्रमाणे कर्मचारी,शिक्षक, प्राध्यापक यांची वैयक्तिक संमती विचारु नये, तसेच ज्यांचेकडून एक दिवसाचे वेतन यापूर्वीच या प्रयोजनार्थ कापून घेण्यात आले आहे.त्यांचे वेतन पुन्हा कापून घेण्यात येऊ नये. कापून घ्यावयाची रक्कम निर्धारीत करण्यासाठी ३१ दिवसांचा महिना समजण्यात यावा. कापून घ्यावयाची निर्धारीत रक्कम पूर्ण रुपयात असावी.

आ)सर्व गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड चे कर्मचारी यांच्यासाठी वरील उपपरिच्छेद (अ) मध्ये दर्शविल्याप्रमाणे कापून घ्यावयाची रक्कम निर्धारीत करुन त्यांचे वेतन रोख / धनादेश याद्वारे अदा करतेवेळी निर्धारीत केलेली रक्कम रोखीन अथवा धनादेशाद्वारे कापून घेतली जाईल, याची दक्षता विभागप्रमुख / कार्यालय प्रमुखाने घ्यावी.

असे धनादेश **<u>मुख्यमंत्री सहाय्यता निधी, (गुजरात)</u>** या नावाने असावेत.

इ) या वसूलीसाठी कर्मचारी यांची संमतीपत्रे मागविण्याची आवश्यकता नाही. मात्र ज्या कर्मचा-यांची मासिक वेतनातून रक्कम कापून घेण्यास हरकत असेल, त्यांनी त्या आशयाचे वैयक्तिक पत्र संबंधित कार्यालयाच्या आस्थापना अधिका-यांकडे द्यावे. वर दर्शविलेल्या एक दिवसाच्या एकूण वेतनाइतक्या रक्कमेपेक्षा कमी रक्कम कापून घेण्यास परवानगी देण्यात येऊ नये.

ई) ज्या व्यक्तींकडून अशाप्रकारे हरकतीची पत्रे प्राप्त होतील अशा व्यक्तींना संबंधित आस्थापना अधिका-यांनी प्रश्नांचे गांभीर्य समजावून सांगावे व त्यानंतरही त्यांनी रक्कम कापून घेण्यास हरकत घेतल्यास, त्यांच्याकडून रक्कम कापून घेण्यात येऊ नये.

४. या संदर्भात खालील प्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी :-

अ) वेतन बील संपूर्ण रक्कमेचे काढण्यात यावे. वेतन वितरणाच्या वेळी वरील प्रमाणे कापून घेतलेल्या रकमेची नोंद एका स्वतंत्र नोंदवहीत घेण्यात यावी. शासकीय कर्मचारी यांचे वेतन वाटप करतानाच त्यांच्याकडून कापून घ्यावयाच्या वेतनाइतक्या रकमांच्या पावत्या तयार ठेवण्यात याव्यात. या पावत्या संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी आपल्या सहीने देऊन त्यात **<u>मुख्यमंत्री सहायता निधी,(गुजरात</u>**) यासाठी संबंधित देणगी आली आहे असे स्पष्ट करावे.ही पावती आयकर सवलतीसाठी सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहील. त्यामुळे मुख्यमंत्री सहायता निधीतून परत वेगळया व्यक्तीगत पावतीची व प्रमाणपत्राची आवश्यकता राहणार नाही. वेतन वाटप करीत असतानाच पावत्या देण्यात याव्यात. धनादेशाद्वारे मिळणा-या रकमांची देखील अशाच त-हेने नोंद घेण्यात यावी.

वरील प्रमाणे कापून घेतलेल्या रकमेचा **<u>स्टेट बँक ऑफ इंडिया, बॅकबे रेक्लेमेशन शाखा, मुंबई - २१ ब्रँच क्र.१५९३ वर देय असलेला मुख्यमंत्री सहायता निधी (गुजरात)</u>** या नांवे धनाकर्ष काढण्यात यावा व तो आपल्या जिल्हयाच्या जिल्हाधिकारी कार्यालयात संबंधित अधिका-यांकडे सुपूर्द करण्यात यावा. जिल्हाधिकारी कार्यालयातून सदर धनाकर्ष प्राप्त झाल्याबाबतची मुख्यमंत्री सहायता निधीची पावती देण्यात यावी. सर्व जिल्हाधिकारी यांनी पावत्या निर्गमित करण्याबाबत मुख्यमंत्री सहायता निधीची पावती पुस्तके मुख्यमंत्री सहायता निधी/निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई-४०००३२ येथून दूताकरवी उपलब्ध करुन घ्यावीत.

ब) बृहन्मुंबईतील, मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख इत्यादींनी गोळा केलेला निधी वरील परिच्छेद ३ (अ) मध्ये नमूद केल्याप्रमाणे धनाकर्ष काढून तो **<u>मुख्यमंत्री सहायता निधी/निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई -३२ यांचेकडे पत्रासोबत सुपूर्द करण्यात यावा व मुख्यमंत्री सहायता निधीची पावती घेण्यात</u>** यावी. शासकीय कार्यालयांनी त्यांच्या कर्मचा-यांकडून देणगी स्वरुपात वेतनातून कापून घेतलेली रक्कम रोखीने स्वीकारली जाणार नाही , याची नोंद घ्यावी.

**क) जिल्हाधिकारी यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेले धनादेश / धनाकर्ष संपूर्ण तपशिलासह (देणगीदारांचे नांव, बँकेचे नांव, धनाकर्ष / धनादेश क्रमांक, दिनांक, रक्कम, पावती पुस्तक क्रमांक, पावती क्रमांक ) उप संचालक (निधी व लेखा) मुख्यमंत्री सचिवालय, निधी कक्ष, रुम नं.६०९ ब, मंत्रालय, मुंबई -३२ यांचेकडे वेळोवेळी पाठवावेत.**

रोखीने प्राप्त झालेल्या निधीच्या बाबतीत अशा निधीचा भरणा जिल्हा स्तरावरील जिल्हाधिकारी यांच्याकडील मुख्यमंत्री निधीच्या स्टेट बँकेकडील बचत खात्यात सुरक्षित ठेवायला हरकत नाही. मात्र त्याचा हिशेब वेगळा ठेवावा. जिल्हाधिका-यांनी विभाग/कार्यालय निहाय यादी तयार करुन एकूण निधीचा स्टेट बँक ऑफ इंडियाचा धनाकर्ष (डिमांड ड्राफ्ट) मुख्यमंत्री सहाय्यता निधी कक्षाकडे तातडीने तपशीलासह पाठवावा.

५. वरील आदेशानुसार मुख्यमंत्र्यांच्या सहाय्यता निधीकरीता जिल्हा परिषदा, मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील विविध निमशासकीय संस्था, महामंडळे, मंडळे, अंगीकृत उपक्रम, अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषी व अकृषी विद्यापीठे, महानगरपालिका, नगरपालिका, नगरपरिषदा, विद्यापीठे इत्यादी संस्थांतील कर्मचारी

यांच्याकडून देखील देणग्या जमा करण्यात याव्यात. संबंधित मंत्रालयीन विभागांनी आवश्यक त्या सूचना संबंधितांना द्याव्यात.

६. मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयाने परिच्छेद ४ (ब) मध्ये उल्लेख केलेल्या देणग्या स्वीकारुन संबंधितांना एकत्रित पोच पावती देण्याची व्यवस्था करावी.

७. उपरोक्त प्रमाणे मुख्यमंत्री सहाय्यता निधीस प्राप्त होणा-या रकमेचा विनियोग गुजरात राज्यातील भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनार्थ शासनाच्या मान्यतेने करण्यात येईल.

८. हे परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक :६८२/२००१,दिनांक ८.२.२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

द.दा.देशपांडे

( द.दा.देशपांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१,मुंबई,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी व लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त, / सर्व जिल्हाधिकारी/जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक,
संचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई (प्रसिध्दीपत्रक काढण्याच्या विनंतीसह)
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
उप सचिव, वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना,महाराष्ट्र,
महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ,
सरकारी / निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना समन्वय समिती
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग /कार्या.क्रमांक १९,१९-अ,२१,२४,२५,२६,३०,दिनांक व इतर सर्व कार्यासने.
निवड नस्ती * [illegible]

calamity/6

परिशिष्ट-अ

**प्रमाण पत्राचा नमुना**

प्रमाणित करण्यात येते की, श्री/श्रीमती / कुमारी
जे / जी कार्यालयात पदावर कार्यरत आहेत, त्यांनी गुजरात राज्यातील भूकंपग्रस्तांना मदत म्हणून **मुख्यमंत्री सहाय्यता निधी, महाराष्ट्र** या सार्वजनिक न्यासाला (Public Trust) रुपये /- (अक्षरी रुपये ) एवढी देणगी दिली असून ही देणगी आयकर अधिनियम, १९६१ च्या कलम ८० (ग) (२) (तीन एच् एफ्) अन्वये १००% आयकर सुटीस / सवलतीस पात्र आहे.

दिनांक :

आहरण व संवितरण अधिकारी
यांची सही व शिक्का